मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून मे.पीडब्ल्युसी या कंपनीला मुदतवाढ देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-३६१६/प्र.क्र.७६/भाग-१/पोल-३

दुसरा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०००३२.
दिनांक : ३० मार्च, २०२२

**वाचा :**

१. माहिती व तंत्रज्ञान विभाग आणि मे. पीड्ब्ल्युसी कंपनी यांच्यामध्ये झालेला करार दि.१७.११.२००९.
२. शासन निर्णय, माहिती व तंत्रज्ञान विभाग क्र. GAD-मातंस 080/4/2014-O/O Directorate of IT-DIT (MH), दि.०१.०७.२०१४.
३. शासन निर्णय, गृह विभाग क्र. गृहआ-२०१५/प्र.क्र.२३०/आस्था-२, दि.२०.०५.२०१५.
४. शासन निर्णय, गृह विभाग क्र. सीसीटी-३६१५/प्र.क्र.९३/पोल-३, दि.२९.०५.२०१५.
५. शासन निर्णय, गृह विभाग क्र. सीसीटी-३६१६/प्र.क्र.७६/भाग-१/पोल-३, दि.२५.०७.२०१६, दि.२५.०७.२०१७, दि.१३.१२.२०१८, दि.१६.०८.२०१९, दि.२१.०१.२०२०, दि.०२.०७.२०२० व दि.२८.०४.२०२१.
६. शासन निर्णय, माहिती व तंत्रज्ञान विभाग क्र. GAD-मातंस 080/4/2014-O/O Directorate of IT-DIT (MH), दि.०९.०५.२०१९.
७. गृह विभाग, उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या (HPC) दि.२८.०१.२०२२ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

गृह विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासंदर्भात सल्लागाराच्या कामकाजासाठी मे. पीडब्ल्युसी या कंपनीची माहिती व तंत्रज्ञान विभागामार्फत दि.१७.११.२००९ रोजीच्या करारान्वये नेमणुक करण्यात आली होती. सदर कंपनीला शासन निर्णय, गृह विभाग दि.२९.०५.२०१५ अन्वये दि.३०.०४.२०१६ पर्यंत, शासन निर्णय, गृह विभाग दि.२५.०७.२०१६ अन्वये दि.३०.०४.२०१७ पर्यंत, शासन निर्णय, गृह विभाग दि.२५.०७.२०१७ अन्वये दि.३०.४.२०१८ पर्यंत, शासन निर्णय, गृह विभाग दि.१३.१२.२०१८ अन्वये दि.३०.०४.२०१९ पर्यंत, शासन निर्णय, गृह विभाग दि.१६.०८.२०१९ अन्वये दि.३०.१०.२०१९ पर्यंत, शासन निर्णय, गृह विभाग दि.२१.०१.२०२० अन्वये दि.३१.०१.२०२० पर्यंत, शासन निर्णय, गृह विभाग दि.०२.०७.२०२० अन्वये दि.३१.०७.२०२० पर्यंत व शासन निर्णय, गृह विभाग दि.२८.०४.२०२१ अन्वये दि.३१.०७.२०२१

पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्प कार्यान्वयन कालावधी दरम्यान शासन व पोलीस प्रशासन यांना तांत्रिक सहाय्य करण्यासाठी सल्लागारांची आवश्यकता आहे. त्यानुषंगाने दि.२८.०१.२०२२ च्या उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीमध्ये मे.पीडब्ल्युसी कंपनीला मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून मुदतवाढ देण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२८.०१.२०२२ रोजी पार पडलेल्या बैठकीतील निर्णयानुसार मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या देखरेखीसाठी प्रकल्प सल्लागार म्हणून मे. प्राईस वॉटर हाऊस कुपर प्रा. लि., या कंपनीच्या दोन व्यवस्थापकीय सल्लागारास पूर्णवेळ तत्वावर दि.०१.०८.२०२१ ते दि.३०.०९.२०२२ पर्यंत खालील बाबींसह मुदतवाढ देण्यात येत आहे :-

1. PMC to submit Monthly Project Progress Report to User department (Police dept) along with Home dept.
2. PMC to pay periodic visit to all Viewing centers including police stations frequently for assessment of the project.
3. PMC to visit Command control center on all working days for assessment of the project.
4. Monthy project review meeting to be scheduled by PMC along with DCP OPS and L&T to update over project progress status and challenges faced.
5. Quarterly project review meeting to be scheduled by PMC along with Jt Cp L&O, Jt CP Traffic and L&T to update over project progress status and challenges faced.

तसेच फेज-२ करीता बृहन्मुंबई महानगरपालीकेने खोदकामासाठी (Trenching) परवानगी दिल्यावर एका सल्लागारास पूर्णवेळ तत्वावर ठेवण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त सल्लागारांना देण्यात येणारे मानधन व इतर भत्ते माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या संदर्भ क्रमांक ६ येथे नमुद दि.०९.०५.२०१९ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार देय राहील तथापि माहिती व तंत्रज्ञान विभागाने सल्लागारांच्या मानधनासंदर्भात भविष्यात काही सुधारणा केल्यास सदर सुधारणा उपरोक्त सल्लागारांना लागु राहतील. तसेच त्यासाठी माहिती व तंत्रज्ञान विभागाने सदर कंपनीची नेमणुक (Empanelment) करणे आवश्यक राहील.

३. सर्व सल्लागारांना देण्यात येणारे मानधन हे दरमहा प्रती व्यक्ती (Man-Month) तत्वानुसार असेल. सर्व सल्लागारांचे दरमहा देयके शासनास सादर करतांना सल्लागारांनी महिन्याच्या कालावधीत केलेल्या कामाचा तपशील / अहवाल शासनास सादर करणे आवश्यक आहे.

४. मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पासाठी नेमण्यात आलेल्या सल्लागारांना मानधन देण्यासाठी येणारा खर्च पोलीस आयुक्त, मुंबई यांच्या अधिनस्त असलेल्या "२०५५-पोलीस, (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना, (दत्तमत) (२०५५ ००९७), ५०-इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३०१७२३०७९५२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RUPALI SANJOG KABARE

Digitally signed by RUPALI SANJOG KABARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc173423779d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5CB43A03D973FF96AABBF02A74864A4681399FE663D8FBDE0441A596BEB3ACDD, cn=RUPALI SANJOG KABARE
Date: 2022.03.30 17:25:37 +05'30'

**( रुपाली कबरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवडनस्ती, पोल-३.